राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमाखाली येणाऱ्या राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, ह्दयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमाकरीता पॉपुलेशन बेस्ड स्क्रिनिंग अंतर्गत उपकरणे व साहित्य सामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-०२१९/प्र.क्र.१५२/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :-**

१. अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसो/रानाआअ/पीबीएस इक्युपमेंट पर्चेस/प्रशासकीय मान्यता/१०८०२०-२१/२०१९, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९ व दिनांक ०६ सप्टेंबर, २०१९ रोजीचे पत्र.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची दिनांक १४ फेब्रुवारी, २०१९ रोजीची मान्य टिप्पणी.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमाखाली येणाऱ्या राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, ह्दयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमाकरीता सन २०१९-२० साठी पॉपुलेशन बेस्ड स्क्रिनिंग अंतर्गत उपकरणे व साहित्य सामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत येणाऱ्या कर्करोग, मधुमेह, ह्दयरोग व पक्षाघात प्रतिबंध नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० मध्ये ९५ शहरांमध्ये राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत पापुलेशन बेस्ड स्क्रिनिंग कार्यक्रम नव्याने चालू करण्यात येणार आहे. त्याकरीता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तपासणी करण्यासाठी काही उपकरणांची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानूसार राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत पापुलेशन बेस्ड स्क्रिनिंग

कार्यक्रमाकरीता आवश्यक असलेली उपकरणे व साहित्य सामुग्री सन २०१८-१९ या वर्षातील FMR Code U.१.१.२ अंतर्गत प्राप्त व सन २०१९-२० मध्ये कमिटेड ठेवण्यात आलेल्या निधीतून खालील विवरणपत्रातील नमूद बाबी पुढील अटींच्या अधिन राहून खरेदी संदर्भात निविदा प्रक्रिया करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

## विवरणपत्र

| अ.क्र | खरेदी करायची बाब | खरेदी संख्या | अंदाजित दर (रुपयात) | प्रस्तावित खरेदीची रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | Digital BP Apparatus | ७८३ | १००० | ७.८३ |
| २ | Cusco's Speculum | १९०५८ | ३०० | ५७.१७ |
| ३ | Examination Lamp | ४४८ | १०००० | ४४.८० |
| ४ | Autoclave (Autoclave, Pressure Cooker) | ५१३ | ८००० | ४१.०२ |
| ५ | Autoclave Drums | ४३१ | १००० | ४.३१ |
| ६ | Mouth Mirror with handle | २०९४६ | ६० | १२.५७ |
| ७ | LED Torch | १४११ | ३५० | ४.९४ |
| ८ | Waist mesurment Tape | १८०९ | १०० | १.८१ |
| ९ | Glacial Acetic Acid 5% (1 Litre Bottle) | ४६५ | २०० | ०.९३ |
| १० | Distilled Water (5 Litre Can) | ६४२ | ६०० | ३.८५ |
| ११ | Cotton Roll (500 gm. Roll) | २४८७९ | १००.८० | २५.०७ |
| १२ | Gloves (100 Pc/ Box No.7) | ४१९७६ | २०० | ८३.९५ |
| १३ | Glucostricp (Per Peice/ Unit Cost) | ४६२९३२६ | २.८ | १२९.६२ |
| १४ | Lancets (Per Peice/ Unit Cost) | ४६५३१२१ | २.९९ | १३९.१३ |
| १५ | Oral Glucos Powder (75 GM per Packet) | २४८८६६ | १० | २४.८९ |
| | **Total** | | | **५८१.८९** |

**अटी :-**

१) सदर उपकरणे व साहित्य सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू उपकरणे व साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत

खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, National Pharmacy Pricing Authority (NPPA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनत्तम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनत्तम दर विचारात घेऊन त्या दरांना अंदाजित दर म्हणून गृहित धरण्यात यावे व त्यानूसार निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी कृती आराखडयामधील सन २०१८-१९ मधील FMR Code U.1.1.2 अंतर्गत मंजुर झालेल्या व सन २०१९-२० मध्ये कमिटेड ठेवण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेत राहून तसेच प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी कार्यक्रम प्रमुखांची राहील.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

१२) सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी-२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८, दिनांक २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १२ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202001301410515217 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.02.14 10:58:17 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.

३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
५) सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई.
६)सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
७) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
८) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
९) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
१०) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
११) निवडनस्ती (आरोग्य-७)